# महाराष्ट्र शासन

**इमारत बांधकाम**
**सर्व प्राथम्य**

क्रमांक :-बैठक-२०१०/प्र.क्र.३५५/का.१३
आदिवासी विकास विभाग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- ३/८/२०१०.

प्रति,

१) आयुक्त,
आदिवासी विकास ,
नाशिक.

२ )अपर आयुक्त,
आदिवासी विकास विभाग,
नाशिक/ठाणे/अमरावती/नागपूर.

३) सर्व प्रकल्प अधिकारी,
एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,

४) मुख्य अभियता,
सा.बां.प्रादेशिक विभाग,
नाशिक.

५) श्री.सी.डी.वाघ,
कार्यकारी अभियंता,
(समन्वयक कार्यकारी अभियंता)
सा.बां.विभाग,मालेगाव.

***विषय :-आदिवासी विकास विभागाकडील आश्रमशाळा व वसतिगृहांची बांधकामे.***

**संदर्भ** :-मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांचे
अ.शा.पत्र क्र.का-३/इमा/५५/२०१०,दि. २०/७/२०१०.
(प्रत सोबत जोडली आहे.)

मा. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग यांचे अध्यक्षतेखाली दि.१७.७.२०१० रोजी मा. सचिव (बांधकामे), सह सचिव (श्री.सिंह), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई, आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक, मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक व इतर संबंधित अधिकाऱ्यांसोबत आदिवासी शासकीय आश्रमशाळा व वसतिगृहाचे बांधकामास, उपलब्ध अनुदान व खर्चाबाबत चर्चा झाली. सदर चर्चेतील मुद्दे खालीलप्रमाणे आहेत :-

१) आदिवासी विकास विभागाकडील उपलब्ध निधी योग्यरित्या व आवश्यक त्या कामावर खर्च होईल यादृष्टीने नियोजन करणे आवश्यक आहे.

२) या वर्षीच्या अर्थसंकल्पात नव्याने समाविष्ट करण्यात आलेल्या आश्रमशाळेच्या कामाची सविस्तर अंदाजपत्रके तांत्रिक मान्यता देऊन १५ दिवसात सादर करावीत.

३) आश्रमशाळांच्या बांधकामासाठी उत्तम स्पेसिफिकेशन्स वापरावेत.

४) सविस्तर अंदाजपत्रकामध्ये computerisation charges ची तरतूद करु नये. नियमानुसार ४% contigencies ची तरतूद करावी. तसेच भाववाढीसाठी १०%

Letter. No. 20100804132721001

F:\DESK 13\2010 CR 355 SA.lwp

रकमेची तरतूद करु नये, कामे वेळेवर पूर्ण करावी. निधी देऊनही कामे वेळेवर पूर्ण न झाल्यास यासाठी संबंधित विभाग जबाबदार राहतील.

५) नवीन आश्रमशाळासाठी जागा उपलब्ध आहे किंवा नाही याबाबत संबंधित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांच्याकडून प्रमाणपत्र प्राप्त करुन घ्यावे.

६) मुख्य अभियंता,सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांनी साधारणत: १५ दिवसात एकदा मा. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग यांची भेट घेऊन प्रगतीबाबत चर्चा करावी.

चर्चेतील वरील मुद्दयांच्या अनुषंगाने मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांनी त्यांचे दि. २०/७/२०१० च्या अर्धशासकीय पत्राने सावजनिक बांधकाम विभागाच्या अधिकाऱ्यांना सूचना दिलेल्या आहेत. ( प्रत सोबत जोडली आहे)

२. सदर बैठकीत मा. प्रधान सचिव, आ.वि. यांनी आयुक्त. आ.वि. नाशिक आणि मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग यांना खालीलपमाणे सूचना दिलेल्या आहेत.:-

१) आश्रमशाळा/वसतीगृह बांधकामासाठी जेथे जागा उपलब्ध आहे त्याची यादी आयुक्त, आ.वि.यांनी मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांना त्वरित द्यावी. तसेच ज्या ठिकाणी शासकीय आश्रमशाळा व वसतीगृहाचे बांधकाम करावयाचे आहे त्याची यादी सार्वजनिक बांधकाम विभागास पाठवावी.

२) सन २०१०-११ मध्ये बजेट झालेल्या व ज्या आश्रमशाळांसाठी/ वसतिगृहांसाठी जागा उपलब्ध आहे त्याची यादी तयार करुन सार्वजनिक बांधकाम विभागास देण्यात यावी व बजेट मध्ये असलेल्या कामाचे सविस्तर अंदाजपत्रकाचे प्रस्ताव संबंधित कार्यकारी अभियंता/अधिक्षक अभियता सा.बा.वि. यांनी त्वरित आयुक्त, आदिवासी विकास यांचेमार्फत शासनास सादर करण्याची कार्यवाही करावी.

३) बजेटमध्ये शाळा/वसतिगृह आहेत परंतु जागा नाही, तेथे जागा वाटाघाटी करुन घेण्याची कार्यवाही आयुक्त, आदिवासी विकास, संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास आणि संबंधित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांनी करावी व त्याची माहिती यादीसह संबंधित कार्यकारी अभियंता, अधिक्षक अभियंत,सार्वजनिक बांधकाम विभाग यांना देण्यात यावी. संबधित कार्यकारी अभियंता व अधिक्षक अभियता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी इमारत बांधकामाची अंदाजपत्रके आयुक्त, आदिवासी विकास यांचेमार्फत प्रशासकीय मान्यतेसाठी शासनास सादर करावीत.

४) आश्रमशाळा/वसतीगृहासाठी जेथे जागा उपलब्ध नाही. तेथे जागा तातडीने उपलब्ध करण्याची कार्यवाही आयुक्त, आ.वि. तसेच संबंधित अपर आयुक्त, आ.वि. आणि प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांनी

करावी व त्याची माहिती यादीसह संबंधित कार्यकारी अभियंता, अधिक्षक अभियंता यांना देण्याची कार्यवाही करावी.

५) शेडस् मध्ये असलेल्या १७४ शासकीय आश्रमशाळांची यादी आयुक्त, आ.वि.नशिक यांनी मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांना उपलब्ध करुन द्यावी.

६) मा. प्रधान सचिव (आ.वि.) यांच्या वरील सूचनांमधील सुचना क्र. १ व ५ मधील अंदाजपत्रके (जेथे जमिन उपलब्ध आहे) प्राथम्याने तयार करुन तात्काळ शासनास सादर करण्याची कार्यवाही संबंधित कार्यकारी अभियंता/अधिक्षक अभिंयंता, सार्वजनिक बांधकाम विभाग व आयुक्त, आदिवासी विकास यांनी करावी.

३. तरी मा. प्रधान सचिव (आ.वि.)यांच्या वरील निदेशाच्या अनुषंगाने व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांच्या दि.१७.७.२०१० च्या अ.शा. पत्रातील निदेशाच्या अनुषंगाने बांधकामाच्या प्रस्तावाबाबत आपल्या स्तरावर सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संबंधित अधिकाऱ्यांबरोबर आढावा घेऊन कामाच्या priority प्रमाणे सविस्तर अंदाजपत्रके प्रशासकीय मान्यतेसाठी विहित मार्गाने सादर करण्याची कार्यवाही तात्काळ करावी व केलेल्या कार्यवाहीचा साप्ताहिक अहवाल शासनास सादर करावा, ही विनंती.

( ला. रा. गुजर )
अवर सचिव

प्रत-

१)मा.प्रधान सचिव,आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई यांना माहितीस्तव सादर.

२)मा. सचिव (बांधकामे), सा. बां. विभाग, मंत्रालय, मुंबई यांना माहितीस्तव सादर.

३) सह सचिव, (श्री. सिंह), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई.३२

४) उप सचिव, (श्री.सुर्यवंशी), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई.३२

५) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नाशिक/धुळे/जळगाव/अहमदनगर/ठाणे/पुणे/औरंगाबाद/उस्मानाबाद/नांदेड/अमरावती/अकोला/यवतमाळ/वाशिम/नागपूर/ चंद्रपूर/विशेष प्रकल्प,नवी मुंबई/भंडारा/गडचिरोली यांना माहितीस्तव व आवश्यक त्या तात्काळ कार्यवाहीस्तव.

५) कक्ष अधिकारी (का.१/५/६/१२)

F:\DESK 13\2010 CR 355 SA.lwp

सुभाष पंचगा
मुख्य अभियंता



**मुख्य अभियंता यांचे कार्यालय**
सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग,
बांधकाम भवन, त्र्यंबक रोड,
नाशिक- ४२२ ००२.
दूरध्वनी क्र.(वै.)२५७४५६३, (का.)२५७४००१
e-mail : nashik.ce@mahapwd.com

**By Fax + E-mail**

अशा.जा.क्र.का-३/इमा/५५/२०१० दि.२०/०७/२०१०

**विषय : आदिवासी विकास विभागाकडील आश्रमशाळा व वसतिगृहांची बांधकामे.**

संदर्भ : मा.प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग यांचेकडे मा.सचिव (बांधकामे) यांची झालेली चर्चा दि.१७/०७/२०१०

प्रिय

दि.१७/०७/२०१० रोजी मा.प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग यांच्याकडे मा.सचिव (बांधकामे), आयुक्त, आदिवासी विकास विभाग, नाशिक, मुख्य अभियंता, सा.बां.प्रादेशिक विभाग, नाशिक व इतर सबंधीत अधिकाऱ्यांसोबत आश्रमशाळांचे उपलब्ध अनुदान व खर्चाबाबत चर्चा झाली. चर्चेतील **ठळक** मुद्दे खालीलप्रमाणे आहेत.

१) आदिवासी विकास विभागाकडे रु.१५० कोटीचा निधी वितरीत करण्यासाठी उपलब्ध आहे. त्यामुळे सदर निधी खर्च होईल यादृष्टीने नियोजन करणे आवश्यक आहे.

२) यावर्षीच्या अर्थसंकल्पात नव्याने समाविष्ट करण्यात आलेल्या आश्रमशाळेच्या कामाची **सविस्तर** अंदाजपत्रके तांत्रिक मान्यता देवून १५ दिवसात सादर करावीत.

३) आश्रमशाळांच्या बांधकामासाठी उत्तम स्पेसिफिकेशन्स वापरावेत.

४) सविस्तर अंदाजपत्रकामध्ये computerisation charges ची तरतूद करु नये. नियमानुसार ४% contigencies ची तरतूद करावी. तसेच भाववाढीसाठी १०% रकमेची तरतूद करु नये. भाववाढीची रक्कम आदिवासी विकास विभाग स्वतंत्रपणे देणार आहे.

५) नवीन आश्रमशाळासाठी जागा उपलब्ध आहे किंवा नाही याबाबत संबंधीत प्रकल्प अधिकारी यांच्याकडून प्रमाणपत्र प्राप्त करुन घ्यावे.

६) मुख्य अभियंता, सा.बां.प्रादेशिक विभाग, नाशिक यांनी साधारणतः १५ दिवसात एकदा मा.प्रधानसचिव, आदिवासी विकास विभाग यांची भेट घेवून प्रगतीबाबत चर्चा करावी.

**वरील चर्चेच्या अनुषंगाने आपणास पुढीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.**

१) नवीन कामाची, जेथे-जेथे जागा उपलब्ध आहे तेथे, त्वरित सविस्तर अंदाजपत्रके तांत्रिक मान्यता देवून सरळ आयुक्त, आदिवासी विकास विभाग, नाशिक यांचेकडे ७ दिवसात सादर करावीत व त्याच्या प्रती मा.सचिव (बांधकामे), मा.प्रधानसचिव, आदिवासी विकास विभाग व या कार्यालयास देण्यात याव्यात.

२) रस्ते, पूल व इमारतीचे नमुने फोटो मुख्य अभियंता, सा.बां.प्रादेशिक विभाग, नाशिक यांच्याकडे पाठवावीत.

३) मासिक प्रगती अहवालातील आकडे काही ठिकाणी जुळत नाहीत. तरी MPR पाठवताना योग्य ती कळजी घेण्यात यावी.

४) यासंदर्भात मा.सचिव (बांधकामे) हे दि.३०/०७/२०१० रोजी मंत्रालय येथे मुख्य अभियंता व अधीक्षक अभियंता यांची बैठक घेणार आहेत. सदर बैठकीसाठी लागणारी माहिती सोबत जोडलेल्या प्रपत्रात **या कार्यालयास दि.२६/०७/२०१० रोजी सायंकाळपर्यंत खास दूतामार्फत पाठवावी.**

**सहपत्र :** वरीलप्रमाणे ४ प्रपत्रे.

आपला

**(सुभाष पंचग[])**
मुख्य अभियंता

प्रति,

**श्री.एस.बी.तामसेकर**
मुख्य अभियंता,

**श्री.एन.एच.जळकोटे**
मुख्य अभियंता,

**श्री.डी.एन.पोटदुखे**
मुख्य अभियंता,

सा.बां.प्रादेशिक विभाग, मुंबई

सा.बां.प्रादेशिक विभाग, पुणे

सा.बां.प्रादेशिक विभाग, नागपूर

**श्री.सी.पी.जोशी**
मुख्य अभियंता,
सा.बां.प्रादेशिक विभाग,
औरंगाबाद

**श्री.पी.जी.गणवीर**
मुख्य अभियंता,
सा.बां.प्रादेशिक विभाग,
अमरावती

- प्रत मा.प्रधानसचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना माहितीस्तव सादर.
- मा.सचिव (बांधकामे), सा.बां.विभाग, मंत्रालय, मुंबई यांना माहितीस्तव सादर.
- प्रत आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक यांना माहितीस्तव.
- प्रत अधीक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, नाशिक/ धुळे/ जळगाव/ अहमदनगर यांना देवून कळविण्यात येते की, प्रपत्रातील आपली माहिती सहा.मुख्य अभियंता यांच्याकडे सादर करावी.
- प्रत अधीक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, ठाणे/ पुणे/ औरंगाबाद/ उस्मानाबाद/ नांदेड/ अमरावती/ अकोला/ यवतमाळ/ नागपूर/ चंद्रपूर/ विशेष प्रकल्प, नवी मुंबई/ नागपूर यांना माहितीस्तव व आवश्यक कार्यवाहीस्तव.
- प्रत श्री.सी.डी.वाघ, कार्यकारी अभियंता, सा.बां.विभाग, मालेगाव (समन्वयक कार्यकारी अभियंता) यांना माहितीस्तव व उचित कार्यवाहीस्तव.